चंद्रपूर जिल्हयातील निस्तार धारकांकरीता जळावू बीटाचे दर रू. ६००/- प्रती बीट वरून रू.३००/-प्रती बीट करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः जबीनी-२०१५/प्र.क्र.३७/फ-९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ७ मे, २०१५

वाचा -

प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-१६/ आर-३/प्र.क्र.८८ (१३-१४)/ १०५/२०१४-१५, दिनांक ८.१.२०१५

प्रस्तावना

महाराष्ट्रातील चंद्रपूर जिल्हयातील लोकांना निस्तार हक्काद्वारे जळावू लाकूड सवलतीच्या दराने विक्री करण्यात येते. निस्तार हक्कातंर्गत अल्प भूधारक, शेतकरी, दारीद्रय रेषेखालील व्यक्ती व मृत्यांच्या अंतिम संस्काराकरीता जळावू लाकूड सवलतीच्या दरात देण्यात येते. चंद्रपूर जिल्हयाकरीता जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचेकडून जळावू लाकडाचे दर मंजूर केले जातात. मजूरीच्या व वाहतूकीच्या दरात मोठया प्रमाणात वाढ झाल्याने, जळावू बीटाच्या दरात सुधारणा करून, सन २०१२-१३ पासून जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी सुधारीत निस्तार दर रू. ६००/- प्रती बीट केलेले आहे. जळावू बीटाच्या दरात वाढ झाल्यामुळे सर्व सामान्य नागरीकांना आर्थिक भार सहन करावा लागत आहे. त्यामुळे सदर जळावू बीटाचे दर कमी करण्याबाबत स्थानिक लोकांची व लोक प्रतिनिधींची वाढती मागणी लक्षात घेऊन, तसेच या संदर्भात विधानसभा सदस्यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नाच्या संदर्भात दिलेल्या आश्वासनाचा विचार करता, चंद्रपूर जिल्हयातील लोकांना निस्तार दरावर विक्री करण्यात येणाऱ्या जळावू लाकडावर सवलत देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्रातील चंद्रपूर जिल्हयाकरीता जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचेकडून जळावू लाकडाचे दर मंजूर केले जातात. मजूरीच्या व वाहतूकीच्या दरात मोठया प्रमाणात वाढ झाल्याने, जळावू बीटाच्या दरात सुधारणा करून, सन २०१२-१३ पासून जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी सुधारीत निस्तार दर रू. ६००/- प्रती बीट केलेले आहे. बीटाचे दर कमी केल्यामुळे मानव वन्यजीव संघर्ष कमी होण्यास मदत होण्याकरीता, वन विभागाची जन सामान्यात प्रतीमा उंचावण्याच्या दृष्टीने व लोक सहभागातून वन व वन्यजीव संघर्ष प्रभाविपणे होण्यास मदत होण्याकरीता वना लगत असलेल्या गावातील लोकांना परवडेल अशा दरास बीटाचा पुरवठा करावा, याबाबत होणारी लोकांची व लोक प्रतिनिधींची वाढती मागणी याचा विचार करता, जळावू बीटाचा निस्तार पुरवठयाचा रू. ६००/- प्रती बीट कमी करून रू. ३००/- प्रती बीट करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९५/२०१५/व्यय-१०, दिनांक ५.५.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०८१७२०३८३६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: CN = Uvais Mohammed Farooqui, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.05.08 17:23:41 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संसाधन उपयोग),महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. विभागीय आयुक्त, नागपूर.
९. मुख्य वनसंरक्षक, चंद्रपूर
१०.मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
११.जिल्हाधिकारी, चंद्रपूर
१२.महाव्यवस्थापक, उत्तर चंद्रपूर, वन विकास महामंडळ, चंद्रपूर.
१३.उपवनसंरक्षक, चंद्रपूर, मध्यचांदा व ब्रम्हपूरी.
१४.उपसंचालक (बफर), ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई / नागपूर.
१६.महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, मुंबई / नागपूर.
१७. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
१८. सर्व कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग (वने), मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती, फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२